आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करून राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या खेळाडूंना व त्यांचा मार्गदर्शकांना प्रोत्साहनपर बक्षिसे देऊन गौरविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन शुद्धिपत्रक क्रमांक : राक्रीधो २०१८ /प्र.क्र १०३ /क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ११ ऑक्टोबर, २०१८

**वाचा:-**

शासन निर्णय क्रमांक - राक्रीधो-२०१२ /(प्र.क्र.१५८/१२)/क्रीयुसे-२, दिनांक ५ फेब्रुवारी, २०१४.

**प्रस्तावना -**

राज्याच्या क्रीडा धोरणातील मुद्दा क्र. ३.८ नुसार आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करून राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या खेळाडूंना व त्यांचा मार्गदर्शकांना प्रोत्साहनपर बक्षिसे देऊन त्यांचा गौरव करण्याची योजना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कार्यान्वित आहे. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट- "अ" मधील नियम क्र. ०३ नुसार पुरस्काराचे स्वरूप निश्चित करण्यात आले आहेत. यामध्ये नमूद स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख बक्षीस देवून गौरविण्यात येते. सदर स्पर्धांच्या नावामध्ये स्पष्टता नसल्यामुळे संचालनालयास प्राप्त प्रस्तावाची छाननी करताना अडचणी येत आहे. यास्तव सदर शासन निर्णयातील नमूद स्पर्धांच्या नावामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शुद्धिपत्रक:-**

संदर्भाधीन दि. ०५.०२.२०१४ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट "अ" मधील नियम क्र.३ मध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

**नियम क्र.३:- पुरस्काराचे स्वरूप :-** आंतरराष्ट्रीय स्पर्धेत पदक प्राप्त केलेल्या खेळाडूंना व त्यांच्या मार्गदर्शकांना त्यांच्या कामगिरीनुसार खालिल प्रमाणे रोख पारितोषिक देण्यात येईल :-

| अ. क्र. | स्पर्धा | संपादन केलेले पदक व रोख परितोषिक रक्कम (रुपये लाखात) | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | सुवर्ण | | रौप्य | | कांस्य | |
| | | खेळाडू | मार्गदर्शक | खेळाडू | मार्गदर्शक | खेळाडू | मार्गदर्शक |
| १ | ऑलिम्पिक गेम्स (खुला गट) (दर चार वर्षानंतर अधिकृत आयोजित होणा-या स्पर्धा) Olympic Games (Senior) Conducted in four year cycle | १००.०० | २५.०० | ७५.०० | १८.७५ | ५०.०० | १२.५० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | (१) वरिष्ठ वर्ल्ड चॅम्पियनशीप Senior World Championships<br>(२) वरिष्ठ वर्ल्ड कप स्पर्धा Senior world Cup<br>(दर चार वर्षानंतर अधिकृत आयोजित होणा-या स्पर्धा) Conducted in four year cycle | ३०.०० | ७.५० | २०.०० | ५.०० | १०.०० | २.५० |
| ३ | एशियन गेम्स (खुला गट)<br>(दर चार वर्षानंतर अधिकृत आयोजित होणा-या स्पर्धा) Asian Games (Senior ) Conducted in four year cycle | १०.०० | २.५० | ७.५० | १.८७५ | ५.०० | १.२५ |
| ४ | कॉमनवेल्थ गेम्स (खुला गट)<br>(दर चार वर्षानंतर अधिकृत आयोजित होणा-या स्पर्धा) Common Wealth Games (Senior ) Conducted in four year cycle | १०.०० | २.५० | ७.५० | १.८७५ | ५.०० | १.२५ |
| ५ | १.वरिष्ठ कॉमनवेल्थ चॅम्पियनशीप Senior Common Wealth Championships<br>२. वरिष्ठ एशियन चॅम्पियनशीप Senior Asian Championships | ७.०० | १.८७५ | ५.०० | १.२५ | ३.०० | ०.७५ |
| ६ | १.युथ ऑलिम्पिक गेम्स Youth Olympic Games<br>२.युथ कॉमनवेल्थ गेम्स Youth Common Wealth Games<br>३.ज्युनिअर वर्ल्ड चॅम्पियनशीप Junior world Championships<br>४.ज्युनिअर वर्ल्ड कप Junior World Cup<br>५.ज्युनिअर एशियन चॅम्पियनशीप Junior Asian Championships | ३.०० | ०.७५ | २.०० | ०.५० | १.०० | ०.२५ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ६. ज्युनिअर कॉमनवेल्थ चॅम्पियनशीप<br>Junior Common Wealth Championships<br>७. शालेय आशियाई स्पर्धा<br>School Asian Competitions | | | | | | |
| ७ | पॅरा ऑलिम्पिक गेम्स<br>Paralympic Games | ३०.०० | ७.५० | २०.०० | ५.०० | १०.०० | २.५० |
| ८ | १.पॅरा एशियन गेम्स<br>Para Asian Games<br>२.पॅरा वर्ल्ड चॅम्पियनशीप स्पर्धा<br>Para world championships | ३.०० | ०.७५ | २.०० | ०.५० | १.०० | ०.२५ |

२. उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयातील परिशिष्ट "अ" मधील नियम क्रमांक - ४, पात्रतेच्या निकषांमध्ये पुढील नियमांचा नव्याने समावेश करण्याचे प्रस्तावीत करण्यात येत आहे:-

(iv) उपरोक्त सर्व स्पर्धेतील सांघिक स्पर्धा असल्यास आठ देशाचे संघ असणे आवश्यक आहे. तसेच वैयक्तीक क्रीडा प्रकारात आठ देशाचे खेळाडू संबंधित खेळ प्रकाराच्या स्पर्धेत / वयोगटात सहभागी असणे आवश्यक आहे.

(v) ऑलिम्पिक स्पर्धा, कॉमनवेल्थ गेम्स व एशियन गेम्स मध्ये ज्या खेळ / क्रीडा प्रकारांचा समावेश असेल तेच खेळ / क्रीडा प्रकार तसेच कबड्डी, खो-खो या देशी खेळांसाठी वरील नमुद स्पर्धामध्ये रोख बक्षिस मिळण्यास अनुज्ञेय राहतील.

(vi) वरील नमुद स्पर्धेमध्ये पदक प्राप्त केल्यानंतर १५ दिवसाच्या आत संचालनालयास अर्ज करावा. सदर अर्ज, स्पर्धा पार पडलेल्या आर्थिक वर्षात व त्या पुढील आर्थिक वर्षा पर्यंतच रोख बक्षीसाठी ग्राह्य धरण्यात येतील.

३. सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०१११६५९११४९२१ असा आहे. हे शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.11 17:05:06 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा ) यांचे खाजगी सचिव.
३) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.

९) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)

१०) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )

११) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.

१२) निवडनस्ती, क्रीयुसे-२.